**गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंतर्गत दि.०७.०४.२०२२ ते दि.२२.०८.२०२२ खंडीत कालावधीतील प्राप्त झालेले पात्र दावे निकाली काढण्यासाठी रु. ३.१८ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक शेअवि-२०२३/प्र.क्र.१२९/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ३० मार्च, २०२४.

**संदर्भ :-** १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१८/प्र.क्र.१९३/११-अे, दि.३१.०८.२०१९.
२) कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र.शेअवि-२०१८/प्र.क्र. १९३/ ११-अे, दि.१९.९.२०१९.
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२१/प्र.क्र.९८/११-अे, दि.२८.११.२०२२.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२१/प्र.क्र.९८/११-अे, दि.१०.३.२०२३.
५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२३/प्र.क्र.१२९/११-अे, दि.४.१०.२०२३.
६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२३/प्र.क्र.१२९/११-अे, दि.६.२.२०२४.
७) संचालक(वि.प्र.),कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. गोमुंशेअवि-२०२२/प्र.क्र.१३१/का.सां-९/ ४४२९/२०२२, दि.८.२.२०२४
८) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. पुनर्वि-२०२२/प्र.क्र.१३१(३)/२-अे, दि.३०.३.२०२४

**प्रस्तावना :-**

गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना दि.७.०४.२०२२ पासून लागू करणे आवश्यक होते. तथापि, प्रशासकीय कारणास्तव प्रस्तुत योजना दि.०७.०४.२०२२ पासून लागू होवू शकली नाही. गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेअंतर्गत दि.०७.०४.२०२२ ते दि.२२.०८.२०२२ या १३८ दिवसाच्या खंडीत कालावधीमध्ये प्राप्त झालेले प्रस्ताव निकाली काढण्यासाठी विशेष बाब म्हणून, संदर्भ क्र. (३) अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सदर खंडीत कालावधीतील पात्र विमा दाव्यांच्या अनुषंगाने अपघातग्रस्त शेतकरी/ वारसदारांना आर्थिक मदतीची रक्कम शासनामार्फत अदा करण्यासाठी संदर्भ क्र. (४) अन्वये रु.२९.९५ कोटी, संदर्भ क्र. (५) अन्वये रु.१७.८३ कोटी, तसेच, संदर्भ क्र. (६) अन्वये रु.१.५१ कोटी अशा प्रकारे एकूण रु.४९.२९ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

संचालक(विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्र.(७) अन्वये दि.०७.०४.२०२२ ते दि.२२.०८.२०२२ या खंडीत कालावधीतील पात्र दावे निकाली काढण्यासाठी रु.३.१८ कोटी इतका निधी वितरीत करण्याची मागणी केली आहे. त्यास अनुसरुन गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेसाठी संदर्भ क्र.(८) अन्वये रु.३.१८ कोटी इतका निधी पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध झाला आहे. सबब गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजने अंतर्गत दि.०७.०४.२०२२ ते दि.२२.०८.२०२२ या खंडीत कालावधीतील पात्र प्रस्तावांच्या अनुषंगाने अपघातग्रस्त शेतकरी / वारसदारांना आर्थिक मदतीची रक्कम शासनामार्फत अदा करण्यासाठी रु. ३.१८ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजने अंतर्गत दिनांक ०७.०४.२०२२ ते २२.०८.२०२२ या १३८ दिवसाच्या खंडीत कालावधीतील संदर्भ क्र.(७) अन्वये प्राप्त झालेले पात्र १६२(१५५ मृत्यु + ७ अपंगत्व) दावे निकाली काढण्यासाठी योजनेच्या अटी व शर्तीनुसार, अपघातग्रस्त शेतकरी/ वारसदारांना आर्थिक मदतीची रक्कम

शासनामार्फत अदा करण्यासाठी रु.३.१८ कोटी इतकी रक्कम गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंअंतर्गत सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्र. डी - ३**
**२४०१ पीक संवर्धन**
**(००) (०६) गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना (कार्यक्रम)**
**(२४०१ ४४२७) राज्य योजना - ३३ अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी संदर्भ क्र. (१) व (२) च्या शासन निर्णय/ परिपत्रकात नमूद तरतूदीनुसार, तसेच, योजनेच्या मार्गदर्शक सूचना आणि अटी व शर्तीनुसारच संदर्भ क्र.(३) अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन खर्च करण्याची जबाबदारी, आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. सदरचा निधी हा आयुक्त (कृषि) यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या छाननी समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र. (७) येथील पत्रासोबत प्राप्त यादीतील पात्र शेतकऱ्यांच्या / वारसदाराच्या बँक खात्यात ECS व्दारे उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी, आयुक्त (कृषि) यांची राहील.

५. उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र, आयुक्त (कृषि) शासनास सादर करतील.

६. प्रस्तुत प्रयोजनार्थ जिल्हास्तरावर जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी तर, संबंधित जिल्हयाचे जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी यांना, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनौसं. क्रमांक १९३/का.१४३१, दि.१४.३.२०२४ व अनौसं. क्रमांक १३१/२०२४/व्यय-१, दि.२०.३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२४०३३०१८११२५११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.03.30 18:21:38 +05'30'

**(प्रतिभा पाटील)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. सर्व मा. विधानमंडळ सदस्य
६. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
७. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२

८. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सह/उप सचिव, (११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०. उप सचिव, (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१३. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१४. सर्व जिल्हा परिषदांचे, जिल्हा कृषि विकास अधिकारी
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा), मुंबई.
१६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखावअनुज्ञेयता), मुंबई
१७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा), नागपूर
१८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखावअनुज्ञेयता),नागपूर
१९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२१. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२२. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-
२३. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२४. सर्व उप विभागीय कृषि अधिकारी
२५. निवडनस्ती, कार्यासन ११-अे.